# ॥सारस्वत॥




( गोंय सारस्वत समाजाचें त्रैमासिक प्रकाशन)

वर्स ३ चैत्र - ज्येष्ठ - १९१६ अंक १

## नवें वर्स... नवी उमेद

श्री शालिवाहन शकाच्या भावनाम संवत्सरांतलो हो पयलो अंक. "सारस्वत नेमाळयाच्या तिसऱ्या वर्साक ह्या अंकानच आरंभ जाता." नव्या वर्साखातीर आमच्या वाचप्यांक शुभेच्छा.

ह्या अंकांत आमी पुर्विल्ल्या इतिहासाचेर उजवाड घालपी दोन दुर्मीळ पुस्तकांचे कांय वांटे उजवाडायल्यात. दोनूय पुस्तकां इतिहासीक नदरेन खूब गरजेचीं जाल्ल्यान ह्या पुस्तकांचे उरिल्ले वांटे आमी फुडल्या अंकांत उजवाडायतले.

पयलें पुस्तक म्हळयार मराठी "कोंकणाख्यान". कवितेच्या रुपांत गोमंतकस्थ सारस्वतांचो तो इतिहास. पुर्तुगेजांची पिडापीड चुकोवंक सारस्वत समाज देशोधडीक लागलो आनी जळामळाक शिंपडलो. कालांतरान तो एकामेकाक वळखना जावन समाजामदीं भेदभावाच्यो वणटी उब्यो जाल्यो. त्या वेळार एका अज्ञात समाजसेवकान समाजामदीं एकवट वाडीक लावपाचे नदरेन "कोंकणाख्यान" रचलें. हें पुस्तक आतां दुर्मीळ जालां. ह्या पुस्तकाची एक पोरनी प्रत फैदासून कै. श्रीपाद व्यंकटेश वागळे हांणी १९०९ वर्सा छापून उजवाडायली. तीच आमी हांगा जशाची तशी परत उजवाडायल्या. ती मूळ वा प्रमाणीत प्रत म्हणूं नज.

दुसरें पुस्तक पुर्तुगेज भाशेंत दोतोर आंतोनियु द् नोरोन्य हांणीं पुर्तुगेज सरकारचे सुचोवणेवयल्यान बरयलें आनी १९२२ वर्सा सरकारानच तें उजवाडायलें.

गोंयांतल्या हिंदूंनी कितले छळ सोंसले ताची ह्या पुस्तकावयल्यान कल्पना येता. मूळ पुस्तकाचें नांव Os Indus de Goa e A Republica Portuguesa (गोंयचे हिंदू आनी पुर्तुगेज प्रजासत्ताक). कोंकणींत अणकारपाचें काम डॉ. वासुदेवबाब कामत हांणी केलां.

असले तरेचें सारस्वत इतिहासाचेर उजवाड घालपी साहित्य कोणाच्याय संग्रहांत आसल्यार तांणीं तें मुजरत धाडचें.

-संपादक.

SARASWAT
Vol. III - No 1







संपादकः
Editor:
चंद्रकांत केणी
Chandrakant Keni



अक्षर-जुळणी आनी मुद्रकः
Typesetters & Printers:
ओमेगा एन्टरप्राइझेस
Omega Enterprises
Vidyanagar Colony, Lane 3
Vidyanagar, Margao (Goa) 403 601



प्रकाशकः
Publisher:
रविंद्रनाथ. एस. कामत
Ravindranath S. Kamat
For Goa Saraswat Samaj
P. O. Box No 43
Margao (Goa) 403 601

FOR PRIVATE CIRCULATION

# अनुक्रम

## ह्या अंकांत





**All Correspondence to be addressed to :**

Goa Saraswat Samaj, "Govinda" Bldg., Panaji (Goa) 403 001
"Saraswat" Magazine, P. O. Box No. 43, Margao (Goa) 403 602

# कोंकणाख्यान
## ऊर्फ
## दक्षिणात्य सारस्वत ब्राह्मणाख्यान

*'कोंकणाख्यान' हें उपलब्ध माहितीनुसार अंदाजे २७३ वर्षांपूर्वी (इ. स. १७२१) प्रसिद्ध झालेलें एक दुर्मिळ पुस्तक आहे. इतस्ततः विखुरलेल्या मूळ गोमंतकस्थ गौड ब्राह्मण समाजामध्ये विविध पोटभेद वाढत जात असून समाजामध्ये जागृति व एकोपा वाढीस लावणे आवश्यक आहे असें वाटून, कुणा एका अज्ञात सरस्वती पुत्राने हें काव्य रचलेलें आहे. बहुधा समाज जागृति व एकात्मता साधण्याच्या हेतूने कवि गांवोगांवीं फिरला व कीर्तन - प्रवचनाद्वारें त्याने सारा इतिहास कथन केला. या ग्रंथाची १९०९ सालीं छापलेली एक प्रत आम्हास उपलब्ध झाली, ती आम्ही जशाच्या तशी इथें पुनर्मुद्रित करीत आहोंत. कांहीं मुद्रणदोष मूळ प्रतींत राहून गेलेले असतील; पण मूळ ग्रंथाशीं प्रामाणिक रहाण्याच्या प्रयत्नात ते सुधारण्याचा मोह आम्ही टाळलेला आहे. इतक्या वर्षांनंतर देखील आपल्या समाजांत भेदभावाचें प्राबल्य कमी झालेलें नाहीं. अशा स्थितींत हा इतिहास समाजाच्या सर्व थरांमध्यें पोचविण्याची आवश्यकता आहे असे आम्हास वाटतें. 'कोंकणाख्यान' चा पूर्वार्ध आम्ही या अंकांत दिलेला असून उत्तरार्ध पुढील अंकांत प्रसिध्द होईल.*

### प्रस्तावना.

गौड सारस्वत ब्राह्मणांतील पोटभेदांचें एकीकरण व्हावें या सदुद्देशानें प्रस्तुत त्या ज्ञातिसमुदायांत बरीच चळवळ चालली आहे. ह्या गोष्टीस कित्येकांचें विरुद्ध मतही दिसून येतें. हे पोटभेद म्हटलेले लहान लहान समुदाय खरे खुरेच पोटभेद आहेत किंवा त्या स्वतंत्र जाती आहेत, असलेही विचित्र तर्क उत्पन्न झालेले दिसतात. या संधीस जुन्या काळीं या भेदांच्या संबंधानें सुज्ञ लोकांचें मत काय होतें तें लोकांच्या नजरेस आल्यास त्यापासून बरेंच कार्य साधेल, असें वाटल्यामुळें हा **'कोकणाख्यान'** नावाचा १८८[1] वर्षांपूर्वीचा ग्रंथ प्रसिद्ध करावा असें मनांत आणिलें.

प्रस्तुत ग्रंथाची बरीचशी जुनी अशी एक प्रत आम्हास उपलब्ध झाली. या ग्रंथाच्या दुसऱ्याही कांहीं प्रति प्रयत्नांतीं मिळण्यासारख्या होत्या. परंतु त्या मिळवून त्यांतून अधिक उणें निवडून शुध्द करून छापण्याचा अवकाश नव्हता. प्रकृत विवादास या ग्रंथाचें सहाय्य मिळावें असा जो आमचा प्रसिद्धीचा मुख्य उद्देश, तो लांबणीवर पडला

१ इ. स. १९०९ सालीं ही प्रस्तावना लिहिली. ग्रंथाचा काल अंदाजें इ. स. १७२१

असता. म्हणून एकाच प्रतीवरून हा ग्रंथ लेखक प्रमादानें पडलेलीं अशुद्धें शुद्ध करून प्रसिद्धित आणिला आहे.

ग्रंथकर्त्यानें आपलें नांव किंवा उपनाम ग्रंथाच्या शेवटीं दिलेलें आढळत नाहीं. पण तो सासष्ट प्रांतांतील मुळचा राहणारा कौशिक गोत्रज सारस्वत ब्राह्मण होता. असें त्यानें लिहिलेलें आढळतें. यावरून तो केळोशीकर असावा असें वाटतें. त्याने ग्रंथाच्या शेवटी जे रामभक्तिविषयक उद्गार काढलेले आहेत त्यावरून तो रामोपासक ऊर्फ रामदास संप्रदायी असावा असें ठरतें. ग्रंथरचना पूर्ण करतांना त्याने असें म्हटलेले आहेः-

**"जनासि कळवावी पूर्वस्थिति ॥**
**जन वर्तवि स्वधर्म पथीं ॥**
**ऐसी अहोरात्र होता खंती ॥**
**तो उन्मेष चित्तीं यें झाला ॥१२६॥**
**उन्मेष उठतां जाण ॥**
**हृदयीं स्फूर्ती झाली निर्माण ॥**
**साह्य सखा रघुनंदन ॥**
**पदबंध आपण स्वयें वदे ॥१२७॥**
**पत्रमषीं आणि लेखनी ॥**
**आन न दिसे रघुपति वांचोनी ॥**
**पाहतां पाहणें नयनीं ॥**
**सर्वी रघुनंदन प्रकाशला ॥१२८॥**
**लेखक लेखन लेखनार्थ ॥**
**स्वयें स्वतः सिद्ध रघुनाथ ॥**
**संभवोनि हृदयस्थ ॥**
**कोकणाख्यान ग्रंथ निर्मिला ॥१२९॥**
**वाच्य वाचक वचनोक्ति ॥**
**स्वयें वदवी श्रीरघुपति ॥**
**सबाह्याभ्यंतर स्थिती ॥**
**व्याप व्यापक रीती प्रकटिली ॥१३०॥**
**येथ बोलती त्रिविध जन ॥**
**परी साधुसंतां समान ॥**
**सर्वांस हृदयस्थ रघुनंदन ॥**
**म्हणोनि माझें नमन त्यांसी" ॥१३१॥**

**अध्याय ८ उत्तरार्ध.**

या ग्रंथावसानींच्या त्याच्या ओव्याकडे पाहिलें म्हणजे तो एकनिष्ठ रामभक्त असल्याचें सिद्ध होत आहे. रामदासी संप्रदायाच्या बाण्याप्रमाणें हा बहुधा फिरस्तेपणांतच दिवस काढीत होता असें **"करितां पृथ्वी पर्यटण ॥ पाहिलें शिवपुरपावन ॥ तेथ भेटले स्वज्ञातिजन त्यानीं आक्षेप जो केला॥१२०॥"** ह्या ओवी वरून अनुमान होतें. **ह्या शिवपुरांतच** राहून त्याने हा ग्रंथ पूर्ण केला. हे 'शिवपुर' कोणतें हें लक्षांत येत नाहीं. गोव्याच्या आजू बाजूस वरील नावाचा गांव कोठें आढळत नाहीं. 'शिवेश्वर' नांवाच्या गांवास शिवपुर म्हणटलें असेल तर किंवा कर्नाटकांत कोठें 'शिवपुर' नांवाचा गांव असेल तर कांहीं समजत नाहीं.

हा कवी बराच चौकस व माहितगार दिसतो. त्यानें ग्रंथ रचण्यापूर्वी बऱ्याच ठिकाणीं फिरून या बाबतींत माहिती मिळविली असावी अशें दिसतें. त्याचा फिरस्तेपणा त्याच्या माहितींत भर घालण्यास त्यास उपयोगी पडला असावा. ग्रंथ रचनेच्या काळाकडे लक्ष देतां जी खरी खरी माहिती लोकांस निर्भीडपणें देऊन लोक विद्विष्टत्वाची परवा न करतां आपलें मत उघड करून दाखविलें आहे तें प्रशंसनीय तर खरेंच पण बऱ्याच धैर्याचें होय. स्वतःचे नांव किंवा उपनाम प्रसिद्धपणें न देतां वास्तव्य व गोत्र मात्र तेवढें उघड देण्यांत त्याचा उद्देश तरी लोक विद्वेष भीरूताच असावी. आज देखील (हा ग्रंथ झाल्यावर सरासरी २०० वर्षांनीं) धर्माच्या बाबतींत परकी सरकारच्या अमलांत कोणास कोणाची भीड ना मुरवत अशा काळांत जर असे विचार स्पष्टपणें लोकांत प्रसिद्ध करणाऱ्यास 'आगेसे आई पीछे चलाई' या मतास चिकटून राहणाऱ्या बहुजन समाजास भिऊन वागावें लागतें. तर प्रस्तुत ग्रंथकाराच्या वेळीं अज्ञान जनित दुराग्रहाचें साम्राज्य जोरांत चालू असलेल्या वेळीं त्याला किती भिऊन वागावें लागत असावें हे सहजच कळून येण्यासारखें आहे. तरी पण त्याने आपलीं मतें निःशंकपणें जागोजाग व्यक्त केलेलीं दिसतात.

आतां नांव न देण्यामुळें कित्येक लोक या ग्रंथास किंवा ग्रंथकारास द्यावा तितका मान देण्यास तयार नसलेले दिसतात. पण आमच्या मतें ग्रंथकाराच्या नांवामुळेंच एकाद्या ग्रंथास महत्त्व देणें अथवा ग्रंथकाराचे नांव नसल्यामुळें त्या ग्रंथाची योग्यता कमी समजणें हें विचारी माणसाचें काम नाहीं. शिवाय आमची अशी समजूत आहे कीं,

ह्या ग्रंथकर्त्यानें आपलें नाव देखील मोघम रीतीने-मुद्रालंकारानें- ग्रंथांतच दिलें आहे. ग्रंथ कर्त्याचें नांव **'रघुनाथ'** असावें असा आमचा तर्क आहे. तें त्यानें आठव्या अध्यायांत वरील १२९ व्या ओवींत 'स्वयें स्वतः सिद्ध रघुनाथ' या चरणांत दिलें आहे. अशा रीतीनें वर्ण्य विषयांत संदर्भास जुळवून युक्तीनें विशिष्ट नांव देण्यांत 'मुद्रा' नावाचा अलंकार होतो. हें आमचें अनुमान आहे. आणि तें बहुधा संभाव्य आहे. असो.

प्रस्तुत ग्रंथ कोणत्या शकांत केला तें ग्रंथ काराच्याच वाणीने दाखवून व ग्रंथ रचनेच्या उद्देशाविषयीं थोडेंसें लिहून ही प्रस्तावना पुरी करू.

**महामंगल मधुमासीं ॥**
**शुक्लपक्षीं श्रीराम नवमीशी ॥**
**भानुवासर पुष्य नक्षत्रेसी ॥**
**कोंकणाख्यानासी संपविलें ॥१२२॥**
**"शके सोळासें त्रेचाळिशी ॥**
**प्लवनाम संवत्सरासी ॥**
**आणि उत्तम उत्तरार्धासी[२] ॥**
**म्हणोनि ग्रंथा संपविलें ॥१२३॥**

ग्रंथ रचण्याचा उद्देश वरतीं दाखविलेल्या 'जनासि कळवावी पूर्व स्थिति' इ. उपसंहारोक्तीवरून दिसतोच. त्याशिवाय उ. अ. ४ ओ. ८१-९० पर्यंत वाचल्या म्हणजे ग्रंथकर्त्याचा प्रशस्थ हेतु स्पष्ट कळण्यासारखा आहे म्हणून त्या येथें उतरून घेतों.

**"येथ संत श्रोते आणि चतुर ॥**
**म्हणती हा कां केला विस्तार ॥**
**हे विद्यमान सर्वांसि सविस्तर ॥**
**ग्रंथ करावया विचार तो काय ॥८१॥**
**ऐसा आक्षेप जरी होईल चित्तीं ॥**
**तरी विनवितों तुम्हां संतांप्रती ॥**
**बहुजनाच्या पहिल्या रीती ॥**
**परि आपली पूर्वस्थिती नेणती ॥८२॥**
**तुह्मी सर्वज्ञ तुम्हां सर्व श्रुत ॥**
**परि बाळां अबळांसि नाहीं कळत ॥**
**ऐसे पाहिले आहेति बहुत ॥**
**ह्मणोनि हा ग्रंथ निर्मिला ॥८३॥**
**जे पाहिले अज्ञानजन ॥**
**पंडित देखोनि करिती प्रश्न ॥**
**बारदेशकर कुडाळे यांचे स्थान ॥**
**हे कोण सांगा म्हणोनि पुसती ॥८४॥**
**आमचें आह्मास ठाउकें वर्तमान ॥**
**परि हे न कळती कोटील कोण ॥**
**या देशीं यावया काय कारण ॥**
**म्हणोनि प्रश्न पैं करिती ॥८५॥**
**हे स्वदेशीजन समग्र ॥**
**हा आपणामाजील जाणावा विचार ॥**
**पंडितासि नकळे या माझार ॥**
**ऐसे अज्ञान जन नेणती ॥८६॥**
**ऐसे या नकळे स्थिति ॥**
**पंडित ह्मणोनि त्याजला पुसती ॥**
**त्यानीं काय सांगावें यांप्रति ॥**
**मग भलते रीती सांगावें ॥८७॥**
**आणिक एक धरोनि महती ॥**
**जाणीव जाणोनि तर्क करिती ॥**
**मानेल तैसें भावोनि बोलती ॥**
**ते वृथा करिती वाग्जल्प ॥८८॥**
**ऐसे जे कां अज्ञान जन ॥**
**त्यांसि कळावया कारण ॥**
**हा ग्रंथ केला निर्माण ॥**
**येथें अज्ञान सुज्ञ समजती ॥८९॥**
**जें याग्रंथीं जितुकें कथन ॥**
**सर्वांसि ठावुकें एकेक वचन ॥**
**सर्वांसि कळावया संपूर्ण ॥**
**यदर्थी निरूपण चालविलें" ॥९०॥**

पुढें याच प्रसंगांत त्यांनीं म्हटलें आहे.

**"ऐसे या प्रसंगास्तंव जाणा ॥**
**करावी लागली ग्रंथ रचना ॥**
**सर्व जनासि कळावया कारण ॥**
**ग्रंथ सूचना पै केली ॥११०॥**
**जेकां चतुर शोधक विचक्षण ॥**
**त्यांसी या ग्रंथीं आवडी पूर्ण ॥**

---

२ शुभ अशा उत्तरायणांत.

जे उदरवृत्तीसि निमग्न ॥
त्यां हे ग्रंथीं अनावडी ॥१११॥
त्यां हे दरे यांची अज्ञान स्थिति ॥
आपुलें नियकर्म नोळखती ॥
परगुण त्यजोनि दोष शोधिती ॥
जेवीं गोक्षीराप्रति गोचीड ॥११२॥
हा ग्रंथ आर्यी मनासि आणितां ॥
कळोंयेईल आपुल्या वृत्तांता ॥
आणि ग्रंथीं बोलिले पुराणोक्ता ॥
तें प्रसंगीं बोलावया अर्थ कळेल ॥११३॥

ऐतिहासिक दृष्ट्या या ग्रंथाचें महत्व बरेंच आहे असें आमचें मत आहे. ग्रंथकारांनीं शोधपूर्वक जी मिळाली ती माहिती यांत ग्रंथित केली आहे. निर निराळ्या प्रदेशांत फिरून, त्या त्या ठिकाणच्या त्या त्या तटांतील जाणत्या जाणत्या मंडळीच्या मताचें सहाय्य घेऊन त्यानें ह्या ग्रंथांत सविस्तृत तीं संगृहित केलेली आहे. व तिचा आपल्या लोकांनीं योग्य उपयोग करून आजच्या पल्ल्यांत निरर्थक झालेले तट मोडून एकी करावी असा त्याचा आजच्या आमच्यांतील ऐक्येच्छू मंडळी प्रमाणेंच सरळ व प्रशस्थ असा हेतु होता. जागोजाग तो त्यानें ग्रंथांत नमूद केलेला दिसतो. अनैक्यामुळें आपले किती तोटे आहेत हें आज जसें आमच्यांतील कित्येक समंजस मंडळीला दिसतें तसेंच त्याकाळीं या ग्रंथकारासारख्या सुज्ञांना वाटत होतें. परंतु अज्ञबहुल समाजाचा दुरभिमान त्याकामी आडवा येत होता. आजदेखील आपल्या समाजाची ही स्थिति बऱ्याच अंशीं तशीच आहे म्हणण्यास अडचण वाटत नाहीं. पोटभेदांच्या एकीकरणाने केवढा मोठा फायदा होईल व तसें नसतां हे भेद आहेत तसे कायम राखण्यांत किती तोटा आहे तें तो एका ठिकाणी याप्रमाणें वर्णन करून दाखवितोः-

"आपुला स्वधर्म कोण करावें काय ॥
हे मूर्खपणें सांडोनि सोय ॥
ह्मणोनि पडले अपाय ॥
दुरभिमानें उपाय सोडिला ॥३१॥
हे एक ज्ञाति होती थोर ॥
भेद झाला अष्ट प्रकार ॥
कोणी पाहिला नाहिं विचार ॥
लघुत्व फार पावले ॥३२॥
जरी भेद या माजी नसते ॥
आणि एकपणें असते ॥
तरी महत्वा काय उणें होतें ॥
बहुमान पावते पैं जगी ॥३३॥
पाहतां पांचाचा एक मेळ ॥
एकमेकां न करिती छळ ॥
त्यांसि राजे पाळिती सकळ ॥
बळें सबळ पै असती ॥३४॥
व्याघ्र जाती एक मेळीं नसती ॥
ह्मणोनि परहस्तें मरण पावती ॥
बळ असोनि त्यांप्रति ॥
एक मेळणी स्थिति पैं नाहीं ॥३५॥
मुंगिया एक मेळें चालती ॥
त्यांसि कोणी न चाळविती ॥
मेळ सोडितां नाश पावती ॥
हे प्रत्यक्ष प्रतीती पहावी ॥३६॥
निर्जीव तृण एक करिती ॥
तेव्हां मेघासि रिघोंन देतीं ॥
मेघ बळें पाताळ भेदिति ॥
परि तृण मेळाप्रति निर्बळ ॥३७॥
तृण पाहतां निर्जीव निर्बळ ॥
एक मेळे होवोनि सबळ ॥
जनवि रक्षण करिती सकळ ॥
पृथ्वीतळ शरण होय ॥३८॥
पाहे पंच अंगुळी मुष्टीवळी ॥
त्यामाजी एक सुटतां होय निर्बळी ॥
असतां चारही अंगुळी ॥
कार्या वेगळी पै होय ॥३९॥
म्हणोनि ऐक्यतें एवढें ॥
आन बळ नाहीं गाढें ॥
वेगळेपणें लाविलें वेडें ॥
नेणोनि मूढें भाविती ॥४०॥
अभिमानें निवांत राहिले ॥
ज्ञातिजने शुद्धत्व यावया उदासिलें ॥
ज्ञातीसि लघुत्व आणिलें ॥
महत्वासि मुकले अभिमाने ॥४१॥

अ. १ उत्तरार्ध.

आजकाल वरील विचार 'जुनी स्थिती आहे ती फार चांगली आहे' असें म्हणणाऱ्यानीं निरभिमान तया मनन करण्या सारखे आहेत.

याप्रमाणें क्षुद्र कारणामुळें आपसांत तट पाडून परस्परांशीं विलग राहण्यानें होणारी हानि न व्हावी

हें त्याला जसें आवश्यक होतें तसेंच तट पडण्यास जीं दुरभिमान मूलक कारणें झालीं त्याचीही समाजास माहिती व्हावी व त्यामुळें भावी पिढीच्या मनांतून हा सत्कीर्तीला मळविणारा दुरभिमान नाहींसा व्हावा ही गोष्ट त्याला अभिष्ट होती. तशा अर्थाचे उद्गार ठिकठिकाणीं त्यानें काढले आहेत.

"हा संप्रदाय वेचाळीस ग्रामाचा ॥
दुजा बारदेश तिजा पेडणेचा ॥
चतुर्थ कुडाळ देशींचा ॥
सारस्वत समूह एकची ॥३९॥
हे समस्त एकची जाति ॥
मुळ समजतां एकची असती ॥
अभिमानें वृथाजल्प ती ॥
भिन्न भिन्न म्हणोनी ॥४०॥

अध्याय. ४ पूर्वार्ध.

दुरभिमाने झाले वाळित ॥
त्या सर्वांसि व्हावी एक पंगत ॥
तैसाचि शरीर संबंध निश्चित ॥
ऐसा उद्देश या ग्रंथी ॥२६॥

अध्याय १ पूर्वार्ध

असें पूर्वार्धात पहिल्याच प्रसंगांत तो म्हणतो. सबंध उतरार्ध, शेवटचा प्रसंग खेरीज करून त्यानें ह्या भेदांचीं कारणें विवरून सांगण्यांत खर्चलेला आहे.

"मागील युगीं जें जें वर्तलें ॥
तेंतें पूर्वार्धी सांगितलें ॥
आणि या युगीं जें आरंभिलें ॥
तें सांगितलें उत्तरार्धी ॥८६॥

अ. १ पू.

ऐसा सारस्वत समुदाय ॥
एकचि अवघा संप्रदाय॥
विभक्त झाले तो अभिप्राय ॥
सांगेन तुज उत्तरार्धी ॥७४॥

अ. ५ पूर्वा.

ह्या रीतीनें उत्तरार्धांत त्यानें अलीकडची म्हणटलेली माहिती घेतली आहे. पूर्वार्धोक्त माहिती सह्याद्रि खंडासारख्या पुराणांत खपून जाणाऱ्या ग्रंथावरून घेतलेली, म्हणून तिला तो पुराणोक्त म्हणतो.

उत्तरार्धाची माहिती त्यानें बऱ्याच जुन्या लेखांचा ताम्रपट्टाचा वगैरे आधार घेऊन लिहिलेली दिसते. त्या त्या स्थळीं तें तें त्यानें उघड सांगितलें आहे. दंतकथा किंवा जुन्या लोकांकडून त्या त्या तटांच्या उत्पत्तीचीं कारणें जशीं त्यास कळलीं, तशीं त्यानें ग्रंथांत निर्दिष्ट केलीं आहेत. उत्तरार्धाचा सहावा अध्याय तर जुन्या बखरीच्या धर्तीवर लिहिलेला आहे. यांत सासष्टीकर व स्मार्त संप्रदायी 'केळोशी कुशस्थळी' कर यांचे आपसांतील भांडण व त्यांचीं परिसमाप्ति हीं तत्कालीन राजानें मिटल्याचा साद्यंत इतिहास आहे. त्यावरून पाहतां गौड सारस्वतांतील स्मार्त व वैष्णव हे जे मुख्य दोन भेद ते त्या काळी मोठ्या प्रयत्नानें एक होऊन गेले हें तरी समाजाचें मोठें भाग्यच समजावयाचें असें म्हणावें लागतें. हा मजेचा दुरभिमान विलसिताचा इतिहास वाचला असतां प्रत्यक्ष आपल्या सोयऱ्याधायऱ्यां आप्तांचा निःपात करण्यापर्यंत दुराग्रहाची मजल ज्या कालांत गेली होती त्या कालांत किंवा त्याच्या अलीकडील थोड्या कालांत दुराग्रहानें अस्तित्वांत आलेले तट कायम राहिले ह्या गोष्टीचें आश्चर्य वाटण्यास कारण राहत नाहीं.

प्रस्तुतच्या प्रमाणें ह्या ग्रंथ कारांच्या वेळीं देखील सत्कार्यास विघ्न आणणारे दुराग्रही हरीचे लाल होतेच हे त्यांच्या ग्रंथांत प्रसंगविशेषीं मनस्ताप जनित निघालेल्या उद्गारांवरून अनुमान करतां येतें. एका ठिकाणीं त्यानें असे उद्गार काढले आहेत कीं, "स्वज्ञातींत कलह माजविती ॥ फाटाफुट करूनि ठेविती ॥ शेवटीं आपण मरून जाती ॥ रौरव स्थानें भरावया ॥३३॥ ऐसें यांसी न म्हणावें नर ॥ तो केवळ पशूचा अवतार॥ जन्मूनियां भूमीला भार ॥ वावुगाची जाहला ॥३४॥ उगाचि भेदाभेद मानणें ॥ स्वज्ञातींत अनेक पंक्ति करणें ॥ हें शुद्ध मूढत्वचि जाणें ॥ न देती शहाणे मान्यता॥३५॥"

पू. अ. ७.

पुढें आठव्या प्रसंगांत तो म्हणतोः-

"सारस्वत ऐसें ज्या अभिधान ॥
त्या ब्राह्मणांसि भेद नव्हता जाण ॥

अवधियांचें एकचि आचरण ॥
क्रिया कर्म धर्म एकचि ॥२३॥
सासष्टीदेशीं प्रथम राहिले ॥
त्यांसि सासष्टीकर म्हणितले ॥
तैसे बारदेशी नाम पावले ॥
आणि पेडणे कुडवाळ देशिक ॥२४॥
ग्राम देशांचीं नामें बोलती ॥
परि अवधियाचि एकचि ज्ञाति ॥
भेदाची कांहीं नव्हती भ्रांती ॥
ऐशी पूर्वस्थिती पै आहे ॥२५॥

यावेळीं दुरभिमान किती जोरांत होता व दुराग्रही लोकाची पुण्याई केवढाली खर्ची पडत होती, हे पहावयाचें असल्यास याच ग्रंथात सांपडण्यासारखें आहे. खालील उद्गार आजकालच्या स्थितींत प्रत्येक सुज्ञ पुरुषानें लक्षांत ठेवण्यासारखे आहेतः-

"एक ते मानूनि आपलें खरें ॥
भलतें शिकविती ते न वाटे बरें ॥
वर्तत असती अविचारें ॥
मानुनी बरें स्फुरती ॥७३॥
आणीक एक बोलती मूढजन ॥
'या ग्रंथीं काय आहे साधन?' ॥
आपण मूर्ख अति मळिण ॥
ते ऐशा वचनीं निंदिती ॥७४॥
गुरु बुद्धि नावडे एकासि ॥
'हे कोण सांगावया आम्हांसी?' ॥
ऐसें बोलोनि दूषिती त्यांसी ॥
ऐसे मूर्ख बहुत आहेती ॥७५॥
जे दोषें विटाळले त्यासी ॥
प्रायश्चित्त देती गुरु संन्यासी ॥
आज्ञापिति पंक्तिपावन करावयासी ॥
त्यांसी आपण अव्हेरिती ॥७६॥
ज्ञातिजनाचे मतें गुरुसी ॥
शरण येवोनि घेतलें प्रायश्चित्तासी ॥
भोजन न करिती त्यांचे पंक्तीसी ॥
'तुझें कार्य आम्हासि पै नाहीं' ॥७७॥
ऐसे गुरुद्रोही म्हणती मूर्खपणी ॥
'पत्र देणार ते आमचे काय धणी ॥
आम्हासि धणी नाहीं कोणी' ॥
विचार नेणती उन्मत्त! ॥७८॥

उ. अ. ७.

हे उद्गार वाचले म्हणजे जवळ जवळ आज २०० वर्षे होऊन गेलीं तरी आपला दुरभिमानग्रस्त सारस्वत समाज एरवीं सगळ्या बाजूंनीं खालावला असला तरी ह्या एका गुणांत अजून पावेतों मूळ स्थितींतून तिळमात्र ढळलेला नाहीं हे पाहून सखेदाश्चर्यानें कुंठित व्हावें लागतें.

आज हें प्रकरण ज्ञातिगुरु सन्निध पोंचलें आहे. त्याकडे सर्वांचे डोळे लागून राहिले आहेत. ब्रह्मीभूत श्रीमदात्मानंद सरस्वतीसारख्या मनस्वी महापुरुषांची कारकीर्द या कामी अनुकूल होती ती दुर्दैवानें आपल्या समाजाच्या हातून गमावली गेली, असें त्यांच्या आनंददायक सहवासांत कांहीं काळ घालविल्यानें त्याचें या बाबतींत अंतरंग पूर्णपणें माहीत असलेल्या प्रस्तुत प्रस्तावना लेखकास म्हणण्यास हरकत वाटत नाहीं. सध्याच्या काळीं उपस्थित झालेल्या या प्रश्नाचा निकाल अमुक एक प्रकारें व्हावा असें उघड सांगण्याच्या भरीस न पडतां प्रस्तुत ग्रंथप्रकाशकांनीं या ग्रंथास प्रस्तावना लिहिण्याची विनंति करून या बाबतींत माझे विचार समुदायापुढें मांडण्याची मला सवड दिल्याबद्दल आभार मानून ग्रंथकाराच्याच तोंडच्या शब्दानीं मंगलमय आशा करून हा अल्प प्रस्तावना लेख पूर्ण करितों.

"ज्ञातिगुरु कर्तव्य थोर ॥
शिष्यशोधन करणें वारंवार ॥
परस्पर ऐक्य विचार ॥
वाढवीत जाणें ॥४८॥"

पु. अ. ४

"ज्ञातिगुरु प्रमुखजनें जाण ॥
वाढवोनि सदाचरण ॥
करावें दीनजनोद्धारण ॥
विरोधकारण नुरवावें ॥३५॥"

पु. अ. ८

*

ॐ तत्सत्.

गोवा महाशाल शके १८३१
सोमे पौष शु. १० बुधे.

रामचन्द्र वामन नायक करण्डे.

*

# अथ कोंकणाख्यान
# उर्फ
# दाक्षिणात्य सारस्वत ब्राह्मणाख्यान.

## पूर्वार्ध.

### अध्याय १.

### ॥ प्राचीन कथन ॥

श्री गणेशायनमः ॥
श्री सरस्वत्यै नमः ॥ श्री गुरुभ्यो नमः ॥

**गणेशः शारदाचैव सद्गुरु सज्जन स्तथा ॥**
**आराध्यं दैवतं गुह्य सर्व मे रघुनंदनः ॥१॥**

आधीं वंदू गणेश्वर ॥
चौदाविद्यांचा दातार॥
कवि चकोरा कृपाकर ॥
मनोभावें साष्टांगीं ॥१॥
मग स्मरिली शारदा ॥
जे चतुराननाची आत्मजा ॥
हंसवाहनी चतुर्भुजा ॥
तियेसी माझा प्रणिपात ॥२॥
वंदिला सद्गुरु कृपासागर ॥
गुरु महिमेचा नकळे पार ॥
ग्रंथरचनीं अभयवर ॥
कर मस्तकीं ठेविला ॥३॥
श्रीगुरुकृपेचाप्रसाद ॥
होतां उदेला परमानंद॥
ग्रंथरचना विनोद ॥
विस्तारिता जाहला ॥४॥
आतां वंदूं श्रोते सज्जन ॥
जे कृपार्णव औदार्यघन ॥
ज्यांच्या कृपावलोकनें जाण ॥
तम अज्ञान निर्मूळ ॥५॥
संत सज्जनाचें महिमान ॥
वर्णितां अगाध न वर्णवे जाण ॥
ह्मणोनी अनन्यभावें शरण ॥
कृपा पूर्ण करावी ॥६॥
श्रोते सज्जन अति चतुर ॥
मी अज्ञान मतिमंद किंकर ॥
सलगी करोनि विनवितों कर ॥
जोडोनियां साष्टांगें ॥७॥
स्वामी तुम्ही कृपा कराल ॥
तरी माझा श्रम परिहराल ॥
आणि कवित्व रूपासी चढेल ॥
तुमचेनि प्रसादें ॥८॥
गोमंतदेशीं गौड ब्राह्मणां ॥
श्री भार्गवें केली स्थापना ॥
त्या सह्याद्रिखंडींच्या महिमाना ॥
परिसीलें जनांहीं ॥९॥
आतां विशदार्थ प्राकृतवाणी ॥
ते पुढें वर्तती कवणस्थानी ॥
ते कळावया ग्रंथ उभवणी ॥
करूं पाहें तुमचे कृपें ॥१०॥
श्रोते सर्वज्ञ तुह्मा विदित ॥
परी बाळा अबळां नाहीं श्रुत ॥
म्हणोनी या काळीं जें जें वर्तत ॥
तो प्रगटार्थ सांगेन ॥११॥
बाळां अबळां स्वधर्मातें ॥
जाणवावें निर्मूनि ग्रंथातें ॥
म्हणोनी विनवितों तुह्मातें ॥
मातें दयामृतें सिंचवा ॥१२॥
श्रोता वक्ता यांचा संवाद ॥
तो मी सांगेन यथाविध ॥
येथ नाहीं नवरस भेद ॥
ह्मणोनी उपेक्षा न करावी ॥१३॥
येथ नाही व्युत्पत्ति विलास ॥
नाहीं शृंगार सौरस ॥
ह्मणोनी न करावें उदास ॥
हेचि माझी विनवणी ॥१४॥
स्वधर्माचरणीं स्वहित जोडे ॥
स्वधर्माचरणीं निश्चय वाढे ॥
स्वधर्माचरणीं भक्ति अपाडे ॥
स्वधर्मा परतें आन नाहीं ॥१५॥
जे नर स्वधर्मे वर्तती ॥
ते नवरसीं ओळंगती ॥
स्वधर्मत्यागें सुख मानिती ॥
ते वरपड होती दुःखार्णवीं ॥१६॥
ब्रह्मकर्म स्वभावता जाण ॥
तेंच ब्राह्मण स्वधर्माचरण ॥
म्हणोनियां श्री भगवान ॥
अर्जुनाप्रति बोलिले ॥१७॥

**शमो दम तपः शौचं क्षांतिरार्जवमेवच ॥**
**ज्ञानं विज्ञान मास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजं॥१॥**

यज्ञ याजनादि षट् कर्म ॥
हाची ब्राह्मणाचा परम धर्म ॥
नित्य नैमित्तिक कर्म ॥
पंचमहायज्ञादि ॥१८॥
जे स्वधर्माचरण करिती ॥
त्यांसी चारी पुरुषार्थ प्राप्ति ॥
यदर्थी तुम्हां संतांप्रती ॥
मी बाळमती विनवितों ॥१९॥
स्वकर्तव्यतत्पर जनांचें ॥
गुणादर हेंचि लक्षण साचें ॥
घेतां कडू पान औषधाचें ॥
परिणाम तो अति गोड ॥२०॥
हा ग्रंथ पैं विचारितां ॥
चातुर्यता लाभे अवळां हातां ॥
आणि आपुली कुलधर्मता ॥
कळों येईल रोकडी ॥२१॥
जे नेणती स्वधर्म विचार ॥
आणि मनासि न आणिती गोत्र प्रवर ॥
कुलदेवाचा करिती अव्हेर ॥
परदेवा वृथा भजती ॥२२॥
जे माता त्यागें नरकप्राप्ति ॥
तीच स्वधर्म त्यागें अधोगती ॥
कुलदैवतधर्म त्यागिती ॥
एकचि गति उभयतां॥२३॥
म्हणोनियां स्वधर्माचरण ॥
श्रेयचि प्राप्त जरी मरण ॥
पर धर्मी भय हें वचन ॥
गीतेंत श्रीकृष्ण बोलिले ॥२४॥

**श्रेयान् स्वधर्मो विगुणः परधर्मा त्स्वनुष्ठितात्।**
**स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥**

ऐसें आहे भगवद्वचन ॥
उपेक्षुनी वर्तती मूढ जन ॥
त्यांसी उमजावया कारण ॥
हा ग्रंथ निर्माण उपदेश ॥२५॥
दुरभिमानें झाले वाळित ॥
त्यां सर्वां व्हावी एक पंगत ॥
तैसाच शरीरसंबंध निश्चित ॥
ऐसा उपदेश या ग्रंथीं ॥२६॥
देती दुजया पोषणातें ॥
शरीरसंबंध वर्ज दोन्ही गोत्रांतें ॥
एतद्विचार पाहती त्यांतें ॥
या ग्रंथीं उपदेश॥२७॥
आणिक आहे सांगणें बहुत ॥
उघडें बोलतां निंदा होत ॥
म्हणोनीच निर्मिला हा ग्रंथ ॥
उमजावया कारणें ॥२८॥
जे नेणती आपुला धर्म ॥
क्षेत्र दैवतादिक स्वकर्म ॥
त्यासी जाणावया सकल वर्म ॥
ग्रंथोद्देश हाच कीं ॥२९॥
या ग्रंथ पंथें चालतां ॥
अपाय नातळे सर्वथा ॥
आपुला स्वधर्म तत्वता ॥
आपसयां कळेल॥३०॥
एक येथील धरावी खूण ॥
क्षेत्र दैवत गोत्र प्रवर ब्राह्मण ॥
या तिहींचें एक अनुसंधान ॥
जाणितलें पाहिजे ॥३१॥
अविचारियांसी नकळे हे रीती ॥
स्वक्षेत्र मुखें उच्चारिती ॥
आणि कुलदैवत म्हणविती ॥
परक्षेत्रींच्या देवातें ॥३२॥
जे भजती देवता जेथ ॥
त्यांचे गोत्रज ब्राह्मण नाहीं त्या क्षेत्रांत ॥
ऐशिया विचारें बहुत ॥
चालत पैं आले॥३३॥
स्वमातेचा त्याग करून ॥
दुजयाचा म्हणवितो आपण ॥
त्यासी कोठें नसेचि धारजीण ॥
व्यभिचार दूषण यापरी ॥३४॥
ज्याचा कोणी न केला शोध ॥
त्यासी वडिलीं पुसावें तुम्ही प्रसिद्ध ॥
आणि अविचार सांडवोनि शुद्ध ॥
मार्ग लावोनि पैं द्यावा ॥३५॥
आतां बहुत सांगणें काय ॥
या ग्रंथाची धरोनि सोय ॥
परोपकारार्थ हें कार्य ॥
अंगिकारिलें पाहिजे॥३६॥
हा अंगिकार जरी कराल ॥
तरी सकल जगा मान्य व्हाल ॥
साक्षात् पुण्य पुरुष बनाल ॥
जगीं रहाल कीर्तिरूपें ॥३७॥

श्रेष्ठ जैसे आचरण करिती ॥
तोचि निश्चय इतर मानिती ॥
तेचि स्थिति इतर जन वर्तती ॥
हें गीतेंत श्रीपति बोलिले ॥३८॥

**यद्यदाचरति श्रेष्ठ स्तदेवेतरोजनाः ॥**
**स यत्प्रमाणं कुरुते लोक स्तदनुवर्तते ॥**

श्री राम कृष्णादि अवतार झाले ॥
ते लोक संग्रहार्थ कर्म आचरले ॥
ह्मणोनि पाहिजे संपादिलें ॥
परोपकारार्थ धर्म-कर्म ॥३९॥
यास्तव श्रेष्ठ श्रोते जन ॥
त्यांसी पुनः पुन्हा माझें नमन ॥
आतां धावें जी अवधान ॥
श्रोतावक्ता संवादा ॥४०॥
श्रोता विनवी वक्तयासी ॥
श्री भार्गवरामें सागरासी ॥
चळण करूनी चौदा बाणेंसी ॥
निर्मिली भूमि शतयोजनें ॥४१॥
सह्याद्रिखंडींचें महिमान ॥
सकळिकां झालें श्रवण ॥
गोमांचळदेश मध्य कोंकण ॥
येथील कथा मज सांगा ॥४२॥
ते कथा ऐकावया आर्त ॥
स्वामींनीं पूर्ण करावे मनोरथ ॥
कैसा आहे वृत्तांत ॥
तो मज सांगितला पाहिजे ॥४३॥
चौदा बाणें चळण केलें ॥
ह्मणोनि चौदाचळ म्हणीतलें ॥
शत योजन कोंकण झालें ॥
अद्भुत या परी ॥४४॥
मग या नूतन भूमिकेंत ॥
राम दिव्य यज्ञ करूं इच्छित ॥
परी योग्य याज्ञिक सारस्वत येथ ॥
दक्षिणेंत नसती कीं ॥४५॥
उत्तर खंडीं तत्काल गेला ॥
सकुलदैवत ज्ञातीयमेळा ॥
अत्यल्प आदरोनी आणिला ॥
दक्षिणद्वारीं यज्ञार्थें ॥४६॥
कान्यकुब्ज आणि उत्कलस्थ ॥
गौडादि मैथिल समस्त ॥
त्यांत ही मुख्य सारस्वत ॥
यज्ञकार्यार्थी योग्य हे ॥४७॥
गुर्जर महाराष्ट्र प्रबळ ॥
कर्नाटक आंध्र मल्याळ ॥
द्रविडांतर्गत धर्मशीळ ॥
दक्षिणार्थी निवडिले॥४८॥
या दशविध ब्राह्मणांवेगळे ॥
भार्गवें कितीक निर्मिले ॥
देऊनि त्यांतें भिन्न स्थळें ॥
ठेविलें नूतन भूमिकेंत ॥४९॥

**केरलाश्च तुर्लिगाश्च तथा गौराष्ट्र वासिनः ॥**
**कोंकणाश्च कऱ्हाडाश्च वरालाटाश्च बर्बराः ॥**

केरल ब्राह्मण केरलदेशीं ॥
तुलिंग नाम तुळवदेशीं ॥
गोराष्ट्र म्हणजे गोकर्ण वासीं ॥
हवीय ही गोराष्ट्री ॥५०
या त्रिवर्ग उत्तर भागासी ॥
स्थापिलें रामें दोघांसी ॥
कऱ्हाडे चित्पावन बर्बरदेशी ॥
क्षेत्रासी पैं देउनी ॥५१॥
गोमंतदेश मध्य कोंकण ॥
षोडश योजनें विस्तीर्ण ॥
येथें स्वकीय सारस्वत ब्राह्मण ॥
गौरवोनी स्थापिले ॥५२॥
ह्मणुनी इतुकियांचें वर्णन ॥
एक सारखें नाहीं जाण ॥
वचन वेष तथा भाषण ॥
भाव भिन्न सप्तधा ॥५३॥
स्वर वाणी वेष बोली ॥
हे भिन्न भिन्न सांगितली ॥
आभरणें क्रियादि ब्रीदावलि ॥
तेही तैशीच पैं ॥५४॥
ऐसें शतयोजन कोंकण ॥
भार्गवें करूनी ब्रह्मार्पण ॥
आचरण विचरण भजन ॥
सांगोनि तपासि निघाले ॥५५॥
सांगितलें आहे भजनासी ॥
ज्याची आवडी आहे जैशी ॥
जें ज्याच्या मनासी ॥
त्याचें भजन करावें॥५६॥
करावयास पाषाणाच्या प्रतिमा ॥
आणि धातु दारूच्या उत्तमा ॥

मृत्तिकेच्याआकृति परमा ॥
भजनीं परम प्रीत धरावी ॥५७॥
ऐशी करोनि देव स्थापना ॥
वाहोनियां क्षेत्रस्थाना ॥
ऐशा रीती स्वज्ञातीय जनां ॥
दक्षिणेंत स्थापिलें ॥५८॥
श्री रामें जें जें आज्ञापिलें ॥
तें सह्याद्रिखंडीं सकल ऐकिलें ॥
परी विशदार्थ पाहिजे सांगितलें ॥
सामान्य जनां ॥५९॥
गौडांतर्गत सारस्वत विप्रांसी ॥
भार्गवें स्थापिलें मध्य कोंकणासी ॥
अग्राहारें दिधलीं गोमंत देशीं ॥
ऐसें सह्याद्री परिसिलें ॥६०॥
सारस्वत राहिले क्षेत्रामाझारीं ॥
मग श्री राम तपासी गेलियावरी ॥
देवस्थापन केलें अति कुसरीं ॥
कोण कोण स्थलें तीं ॥६१॥
क्षेत्र दैवत गोत्र प्रवर ॥
अनुक्रमें या ब्राह्मणाचें सर्व ॥
विचारही सांगा सविस्तर ॥
आवडी फार ऐकावया ॥६२॥
भिन्न भिन्न गोत्रीं ब्राह्मण ॥
त्यांचे ग्राम अग्रहारें कोण ॥
आणि कुलदेवतांचें भजन ॥
तें मज संपूर्ण सांगावें ॥६३॥
मागील युगीं उभारणी झाली॥
वाढत चढत वृद्धि होत आली ॥
पुढील काळीं स्थिति कैशी वर्तली ॥
या कलियुगीं मज सांगा ॥६४॥
कलि वर्तमानाची स्थिति ॥
सर्व आपणा ठाऊक व्युत्पत्ति ॥
तरि हे आतां यथा निगुती ॥
तेचि मजप्रति सांगावी ॥६५॥
आणि ग्रंथीं नाहीं परिसिले ज्ञातिभेद ॥
परि प्रयक्ष पाहतां बहुविध ॥
वर्तमान दिसे तें प्रसिद्ध ॥
भिन्न भिन्न नांवें त्यां ॥६६॥
बारदेशकर कैसे झाले ॥
पेडणेकर कैसे वेगळाले ॥
कुडवाळदेशी सांगा वहिले ॥
कोणत्या स्थळाचे पैं ॥६७॥
आणि दोन तीन भेद आहेती ॥
शेणवी पैकींच एकास म्हणती ॥
एकास नरवणे बोलती ॥
एकते राजापुरी पैं॥६८॥
एक ते भालावली अवसरे ॥
वर्तती मनस्वी विचारें ॥
यांची शुद्धी खरें खुरें ॥
तें मज बरवें सांगावें ॥६९॥
ऐसा श्रोता विनवितां ॥
संतोष झाला वक्तया चित्ता ॥
म्हणे धन्य धन्य तूं गा श्रोता ॥
स्वधर्म कर्मी तत्पर ॥७०॥
अगा आपुला ज्ञाति धर्म ॥
आणि परंपरा आचार कर्म ॥
हें नेणे तो मूर्ख परम ॥
मनुष्यांमाजी पशुचि तो ॥७१॥
आपुला ज्ञाति कुळधर्म ॥
विवंचोनी ज्ञाता वर्ते परम ॥
उचित अनुचित कर्म ॥
जाणे तो पुरुष सुज्ञाती ॥७२॥
तरी त्वां बरवा केला प्रश्न ॥
यांचें तुज सांगेन विवरण ॥
पुढील प्रसंगीं विस्तारून ॥
सावधान अवधारीं॥७३॥
राम तपासी गेलियावरी कथन ॥
सांगेन परि येथ बोलती जन ॥
श्लोकाची टीका नव्हे म्हणून ॥
तरी तेंही कारण अवधारीं ॥७४॥
जेव्हां कोंकण निर्माण झालें ॥
तेव्हां सर्व रचनेसि वर्णिलें ॥
आणि ब्राह्मणांसी दान दिधलें ॥
पुढें राम गेले तपासी ॥७५॥
मग श्रीरामाच्या आज्ञेप्रमाण ॥
ब्राह्मण राहिले स्थल धरून ॥
तदुपरीचें वर्तमान ॥
तें सह्याद्रिखंडीं नसे कीं॥७६॥
हा अलिकडील वृत्तांत ॥
ह्मणोनि श्लोक टीका नाहीं येथ ॥
परी पूर्वानुसंधानयुक्त ॥
तें रामें स्वमुखें आज्ञापिलें ॥७७॥
तीर्थ क्षेत्र महिमान ॥
भैरव पुराणीं केलें लेखन ॥

आणि अन्यत्र पुराणामाजीं जाण ॥
सविस्तर संपूर्ण परिसावें ॥७८॥
श्री भार्गवाचे आज्ञेकरून ॥
केलें क्षेत्र दैवत स्थापन ॥
तेंचि कुलदैवत त्याचें भजन ॥
त्यांच्या क्षेत्राचे ब्राह्मण त्यां भजती ॥७९॥
श्री रामें जैशी आज्ञा केली ॥
तैशी ब्राह्मणीं रचना निर्मिली ॥
ते प्रत्यक्ष वर्तमानें पाहिजे पाहिली ॥
जे बोलिली या ग्रंथीं ॥८०॥
तें हें सारस्वत ब्राह्मणाख्यान बोलिलें ॥
सह्याद्रिखंडींचें ह्मणीतलें ॥
ज्या पूर्व रचनेसी वर्णिलें ॥
विशदार्थ तेथून॥८१॥
प्रथम प्रकरणीं श्रोतयाचा प्रश्न ॥
पुसिलें सारस्वतविप्राख्यानालागून ॥
द्वितीय प्रकरणीं बोलिले जाण ॥
महिमान सासष्टी देशाचें ॥८२॥
तृतीय प्रकरणीं तेविसां क्षेत्रीचें ॥
तिसवाडी सहीत निरोपिलें साचें ॥
एक महिमा न सर्वांचें ॥
एक समूह चतुर्थ॥८३॥
बारदेश पेडणे कुडवाळ ॥
हें पंचम प्रकरणीं सकळ ॥
वर्णिलें पुरातन नूतन स्थळ ॥
तें षष्ठम प्रकरणीं समजाया ॥८४॥
सप्तम प्रकरणीं सगोत्र प्रवर ॥
सारस्वत ब्राह्मणांचें सविस्तर ॥
देव आणिले बाहेर ॥
हें अष्टम प्रकरणीं सांगितलें ॥८५॥
मागील युगीं जें वर्तलें ॥
तें पूर्वार्धी सांगितलें ॥
आणि या युगीं जें आरंभिलें ॥
तें सांगितलें उत्तरार्धी ॥८६॥



## अध्याय २.

### ॥ सासष्टी महिमान ॥

श्रीमन्महागणाधिपतये नमः ॥
वक्ता सांगे श्रोतयासी ॥
जो प्रश्न तुवा केलासी ॥
सांगेन तया अभिप्रायासी ॥
चित्त देवोनी अवधारीं ॥१॥
येथें चातुर्य शोधक विचक्षण ॥
सूचक बहुश्रुत दीर्घ-दृष्टी जाण ॥
यासीं पूर्व स्थिति समजावया कारण ॥
आवडी परम या ग्रंथीं ॥२॥
जे सभारंजक सद्भाव विनत ॥
परगुण ग्राहक निर्मळ चित्त ॥
दुरभिमान विवर्जित ॥
त्यांसि प्रिय ग्रंथ हा॥३॥
आतां एक तुज सांगेन ॥
गोमांचळ देशा दिधला नेम ॥
हे मांडणी आहे पुरातन ॥
समस्त क्षेत्रां माझारी ॥४॥
गोमांचळ देशाचें कथन ॥
करूनि विवरण सांगेन ॥
हा देश असे मध्य कोंकण ॥
त्याचें प्रमाण ऐक गा ॥५॥
गोमांचळ दक्षिणभागा ॥
अष्टयोजनावरी गंगा॥
दुसरी अष्ट योजनें पैं गा ॥
उत्तर भागीं असे तीं ॥६॥
दोन्ही गंगामध्यें जाण ॥
षोडश योजनें मध्य कोंकण ॥
भूमिकानाम निरूपण ॥
उत्तरार्धी करीन॥७॥
श्रोता विनवी वक्तयासी ॥
सांगितलें दोन्ही गंगांसी ॥
तेथील व्यवस्था कैशी ॥
ती मजशीं निरोपावी ॥८॥
वक्ता सांगे श्रोतयासी ॥
श्रीभार्गवें आचरोनी तपासी ॥
प्रसन्न करोनी शंकरासी ॥
वरदानासी मागितलें॥९॥
हें जें क्षेत्र निर्मिलें कोंकण ॥
येथें जें पृथ्वीवरी निर्माण ॥
तें असावें संपूर्ण ॥
या क्षेत्रामाझारी॥१०॥
अष्टोत्तरशत तीर्थें निर्मावीं ॥
द्वादश ज्योति लिंगें असावीं ॥
अठराभार वनस्पती व्हावी ॥
आणि तृण वृक्ष गुल्मलता ॥११॥

दिव्य वल्ली केळी नारळी ॥
सुगंध चंदन पुगी फळी ॥
निचुंबलींवृक्षा मेळीं ॥
नाना पुष्पावळी साजिऱ्या ॥१२॥
सुभिक्ष असावें सर्वकाळ ॥
वृक्ष असावे सदा सफळ ॥
धान्य पर्जन्य पिकावळ ॥
पूर्ण यास्थळीं असावी ॥१३॥
भार्गवें जितुकें मागितलें ॥
शंकरें तितुकेंहि दिलें ॥
गंगादि ज्योतिलिंगे सकळें ॥
शतयोजन स्थळामाझारी ॥१४॥
त्यांतून स्वकीय ब्राह्मण ॥
रामें मध्य कोंकर्णी स्थापून ॥
षोडश योजन स्थानवृत्ति देऊन ॥
स्थिर केलें तयांसी ॥१५॥
ब्राह्मण स्थळ धरूनि राहिले जेथ ॥
क्षेत्राभिधान ठेविलें तेथ ॥
आणि स्थापिलें आराध्य दैवत ॥
तेचि कुल दैवत तयांसी ॥१६॥
ऐशी पूर्वकाळींची रचना ॥
सविस्तर सांगेन ठिकाणा ॥
बरवें आणोनि अंतःकरणा ॥
समजोनियां ठेविजे ॥१७॥
गोमांचळ दक्षिणभागासी ॥
त्या माजी प्रथम सासष्ट देशीं ॥
राहिले धरून क्षेत्रासी ॥
त्या वृत्तांतासि अवधारीं ॥१८॥
सर्वांगासी शिरप्रधान ॥
तेवीं मध्यकोंकर्णी सासष्टी जाण ॥
येथील जें कां निरूपण ॥
विशदार्थ तें सांगतों ॥१९॥
सासष्ट देशीं मुख्य सदर ॥
जोहार ग्राम महा थोर॥
तेथें देव श्रीदामोदर ॥
महिमा अपार तयाचा॥२०॥
ऊर्जा चाले सोपस्कर ॥
नित्य हरिकथा जागर ॥
शंखभेरीवादन परिकर ॥
महोत्साह होतसे॥२१॥
पंचगोत्रीचे तैं ब्राह्मण ॥
त्यांसी श्रीदामोदर भजन ॥
कौशिक भारद्वाज गोत्री जाण ॥
आणीक असती त्रिगोत्रींचे ॥२२॥
गीर्वाणभाषीं मठग्राम ॥
देशभाषीं ह्माडग्राम॥
त्या क्षेत्राची महिमा उत्तम ॥
वर्णिली आहे॥२३॥
दुसराग्राम वेरणे जाण ॥
श्रीम्हाळसेचें आद्यस्थान ॥
तेथींचें अपार महिमान ॥
आहे जन प्रसिद्ध॥२४॥
देवा दांनवां समुद्र मथनीं ॥
पियुष विष दिधलें वांटोनी ॥
भक्तजनांच्या सांभाळा लागोनी ॥
प्रयाण केलें सासष्टीं ॥२५॥
दिव्य तेज प्रकाशलें फार ॥
पर्वत मस्तकीं हाणीतलें नूपुर ॥
सरोवर निर्मिलें महाथोर ॥
रहिवास मंदिर वेरणें ॥२६॥
गाई चारितां गोवळीं देखिलें ॥
पाणी पाहोनि श्रुत केलें ॥
तें महाजनां परिसिलें ॥
सत्वर आले त्या स्थाना ॥२७॥
चौदा शतें महाजन ॥
श्रुत होतां आले धांवोन ॥
अद्भुत चमत्कार देखोन ॥
लोटांगणें घातलीं॥२८॥
मग आज्ञापिती महाजन ॥
टांकियां आवरिलें पाषाण ॥
औट घटिकांमाजी जाण ॥
दिव्य प्रतिमा निघाली ॥२९॥
औट घटिका सरतां ॥
आणि घावो टांकीसी लागतां ॥
दुग्ध रक्त अवचितां ॥
धारा पैं लागल्या॥३०॥
ऐसा दावोनि चमत्कार ॥
रहिवास केला क्षेत्रामाझार ॥
अपार ऊर्जा निरंतर ॥
महोत्साह पैं तेथें॥३१॥
नित्योत्साह हरिकथा पुराण ॥
भेरी टाळ मृदंग वादन ॥
पताका चामरें छत्र निशाण ॥
दीपोत्साह बहुसाल ॥३२॥

तेथें ब्राह्मण आहेत पंच गोत्री ॥
कौशिक गार्ग्यो भारद्वाज अत्रि ॥
ऐसा समुदाय तया क्षेत्रीं ॥
आणीक गोत्री आहेत ॥३३॥
ब्राह्मणासी भजन सर्वथा ॥
मुख्य म्हाळसा देवता ॥
आणि आद्य सांतेरी तत्वतां ॥
ऐसी कथा तेथीची ॥३४॥
तिसरा ग्राम कुडतरी ॥
प्रबळ देव दुर्गा सांतेरी ॥
तियेची क्षेत्र महिमा थोरी ॥
ब्राह्मण चतुर्गोत्रींचे ॥३५॥
भारद्वाजादि चोहों गोत्रींचे ॥
भजन करिती कुळदेवतेचें ॥
अपार महिमान तेथीचें ॥
महोत्साह निरंतर॥३६॥
चौथा बाणावली थोर ग्राम ॥
बाणेश्वर देवाचें नाम ॥
वर्णितां तेथील महिमान ॥
अपार जाण पैं आहे ॥३७॥
इषुपात क्षेत्र पुण्य पावन ॥
सह्याद्रिखंडीं असे वर्णन ॥
ह्मणोनि संकेत संज्ञा जाण ॥
बोलिलों आहें॥३८॥
दैवतांचा महिमा अपार ॥
पुराण कथा नित्य जागर ॥
अखंड महोत्साह बडिवार ॥
ऊर्जा नित्य चालते ॥३९॥
कौशिक अत्रि गोत्रादि तीन्ही ॥
गोत्रींचे ब्राह्मण तया स्थानीं ॥
बाणेश्वर आणि कात्यायनी ॥
त्यांचे भजनीं रत सदा ॥४०॥
गोमांचळ दक्षिण भागासी ॥
समुद्रतीरीं इषुपाता ऐशी ॥
नामें स्तविती बाणावलीसी ॥
राम क्षेत्रासि मंडण तें ॥४१॥
तयासी भैरव क्षेत्र म्हणती ॥
जें सह्याद्रि पश्चिम तटाप्रती ॥
येथें अग्रज विप्र असती ॥
वेदांग पाराप्रत पावले ॥४२॥
मंत्रौषधि तपोयाग ॥
बळें जिंतिले क्रोध मार्ग ॥
षट्कर्मी निरंतर सांग ॥
स्वधर्म स्वांगें आचरती ॥४३॥
कोंकण ह्मणजे पृथ्वीकोण ॥
तैं विद्यावंत सारस्वत ब्राह्मण ॥
ज्यांतें कोंकणे नामाभिधान ॥
दैशिक वचन लोकांत ॥४४॥
पांचवा ग्राम शंखावळी ॥
सागर नदी संगम जवळी ॥
क्षेत्रीं भजनीं तिन्ही स्थळीं ॥
शांता नृसिंह विजय दुर्गा ॥४५॥
दैवतांचा महिमा थोर ॥
नित्य हरिकथा जागर ॥
छत्र चामरें वाद्यें अपार ॥
ऊर्जा सुस्थिर चालते ॥४६॥
वाखाणिती क्षेत्र महिमान ॥
नदी सागर संगम म्हणोन ॥
शंख होताति निर्माण ॥
पुण्य पावन स्थान तें ॥४७॥
शंखोत्पत्तीचें स्थान ॥
ह्मणोनि शंखावळी अभिधान ॥
आहे प्रसिद्ध पुरातन ॥
क्षेत्र महिमान तेथींचें॥४८॥
ब्राह्मण समुदाय बहुत ॥
सप्त गोत्रींचे असत॥
त्यांमाजी चारी गोत्रींचे तेथ ॥
सांगणें निश्चित ऐका तें ॥४९॥
जमदग्नि वत्सगोत्री एक ॥
भारद्वाज आणि कौशिक ॥
शंख पिंग कुत्स देख ॥
तिन्ही आणिक आहेती ॥५०॥
गोमांचळ दक्षिण भागासी ॥
तीर्थराज समीपतेसी ॥
उत्तम नाम ग्रामासी ॥
नरसिंहलक्ष्मी ते ठायीं॥५१॥
चतुर्वर्ण जन आहेत ॥
चारी आश्रम सेवीत॥
विप्र अग्र-जन्में वसत ॥
वेदांग पाराप्रत पावले ॥५२॥
अस्खलित तपो योग बळ ॥
साधनीं भस्म क्रोधानळ ॥
जेणेंकरून धर्म प्रबळ ॥
कारणभूत सकळ जगा ॥५३॥

तेथें सौभाग्यवतीं ज्या नारी ॥
त्या पतिव्रता धर्मी तत्परी ॥
इषुपात रामक्षेत्रामाझारी ॥
नगरी शंखावळी मंडण ॥५४॥
जिच्या ठायीं कमलनेत्र कमलापति ॥
वैकुंठाहुनी उतरले क्षितीं ॥
भक्तानुग्रहालागुनि सनातन वस्ति ॥
व्हावया मुक्ति जड जीवां ॥५५॥
ज्याचे दर्शनमात्रेंकरूनी ॥
मोचन होय संसार बंधनीं ॥
सुरवरांच्या कार्यालागुनी ॥
जगज्ञीवन त्या ठायीं ॥५६॥
सहावा गांव रायचुर ॥
श्री कामाक्षा रहिवास मंदिर ॥
तैं ब्राह्मण कौशिक अत्रिगोत्र ॥
क्षेत्रीं वर्तत आहेत ॥५७॥
भक्त लोटलीकर ब्राह्मण ॥
करीत असतां पृथ्वी प्रयाण ॥
कौरंज देशीं अंबा प्रसन्न ॥
झाली असे तयासी ॥५८॥
कौरंज देशाहुनी आणीली ॥
स्वदेशाजवळी पावली ॥
तंव रात्रौ वस्ति झाली ॥
शेजार ग्रामीं राईत ॥५९॥
प्रातःकाळीं स्वग्रामीं लोटलीसी ॥
जाऊं पाहे घेऊनि देवतेसी ॥
परी न ढळे स्थिर त्या स्थळासी ॥
मान्य होऊनि राहिली ॥६०॥
राय ग्रामीं राहिली असतां॥
दोन्हीं ग्रामी कामाक्षा देवता ॥
राय लोटलीकर भजती तत्वतां ॥
या निमित्तास्तव जाण गा ॥६१॥
महा जागृत देवस्थान ॥
तेथील सांगतां महिमान ॥
ऊर्जा चालत साधारण ॥
महोत्साह पैं मोठा॥६२॥
सातवा ग्राम लोटली ॥
देव रामनाथ सांतेरी माऊली ॥
कौंडिन्य वत्स दोन्ही गोत्रें सांगितलीं ॥
त्या क्षेत्रींच्या ब्राह्मणी ॥६३॥
आठवा ग्राम वेती ॥
तैं दैवत सांतेरी भगवती ॥
द्वय गोत्रीं ब्राह्मण असती ॥
भारद्वाज आणि वत्स ॥६४॥
नववा ग्राम कुशस्थळीं म्हणती ॥
देशाभिधान कुडथाळे बोलती ॥
ब्राह्मणांसी कुडयाळे वदती ॥
सुबुद्ध श्रेष्ठ असती जे ॥६५॥
क्षेत्र महिमान असे थोर ॥
देव मंगेश महारुद्र ॥
तया ब्राह्मणांचें गोत्र प्रवर ॥
जमदाग्नि वत्स कौंडिन्य ॥६६॥
अचाट करणी देवाची ॥
पूजा काळीं चमत्काराची ॥
मोठी ध्वनि शिंगी नादाची ॥
अभिषेक समयीं होतसे ॥६७॥
गोमांचळ दक्षिण भागासी ॥
पातकें नासती म्हणून अघाशी ॥
प्रसिद्ध नांम गंगेसी ॥
समुद्रासी मिळाली॥६८॥
द्वारावती समान ॥
कुशस्थळी नामें क्षेत्र जाण ॥
वास्तव्य जैं षट्कर्मी ब्राह्मण ॥
गंधर्वासमान लोकही ॥६९॥
तेथें मंगेश नामें महादेव ॥
मनोवाकायें पूजित मानव ॥
इच्छिलें फळ दे कैलास राव ॥
भोळा चक्रवर्ति धन्य तो ॥७०॥
दशम ग्राम केळोशी ॥
तेथ रहिवास शांता दुर्गेसी ॥
जिचे अगाध महिमेसी ॥
वर्णितां कवि भागले ॥७१॥
मूलमाया आदिशक्ति ॥
असुर मर्दिनी लीला व्यक्ति ॥
दैवत चामुंडां द्वय हस्तीं ॥
असुर कंठीं प्रगटली ॥७२॥
आश्विन श्रावण माघ मार्सी ॥
महदुत्सव या स्थलासी ॥
कौशिक गोत्री ब्राह्मणासी ॥
अग्रहारासी पैं येथें ॥७३॥
दैवत महिमान थोर ॥
नित्य नेमें हरिकथा जागर ॥
छत्रें चामरें वाद्यें अपार ॥
उर्जा दिनरात्र चालते ॥७४॥

उपरी वत्स गोत्री ब्राह्मण ॥
त्यांसी देवतेचा वर होऊन ॥
तो दुजिये ग्रामींचा जाण ॥
कन्यादान पैं केलें ॥७५॥
कन्यादान करूनि त्यासी ॥
क्षेत्र दिधलें विभागासी ॥
ह्मणोनी द्विगोत्री ब्राह्मणांसी ॥
सांगितलें तेथें॥७६॥
देवतेचा वर झाला ॥
म्हणोन वरदा नाम पावला ॥
आणिक एक भक्त भला ॥
आहे सांगितला त्या स्थानीं ॥७७॥
भारद्वाज गोत्री पुरोहित ॥
पाणदीकर त्याची संतत ॥
त्यासी ते स्थानीं नाहीं वृत्त ॥
परी भजन देवता आहे ॥७८॥
श्रोता विनवी वक्तयासी ॥
कां केलें कन्यादानासी ॥
काय कारण वर धावयासी ॥
त्या वृत्तांतासी सांगिजे ॥७९॥
आणि सांगितला जो पाणदीकर ॥
त्याचा कैसा वर्तला विचार ॥
केळोसी ग्रामीं पुरोहित पुत्र ॥
तोही समग्र सांगावा ॥८०॥
वक्ता ह्मणे परियेसी ॥
आधीं वदतों पूर्व रचनेसी ॥
मग तुझिया अक्षेपासी ॥
पुरवीन उत्तरार्धी॥८१॥
अवघें याचें प्रकरण ॥
उत्तरार्धी कळेल संपूर्ण ॥
यथानुक्रमें करून ॥
सांगेन तेथें सविस्तर॥८२॥
अकरावा ग्राम गिरडोली ॥
देवता महंमाया माउली ॥
वटस्थळीं प्रकट झाली ॥
वट-वेदता नाम तियेसी ॥८३॥
त्रिगुणात्मक तिन्ही आकृती ॥
महामाया माउली म्हणती ॥
तिन्हीं अंशें एक शक्ति ॥
जड जीव पंक्ति उद्धरी ॥८४॥
तेथें तिन्ही गोत्रिंचे ब्राह्मण ॥
कौशिक भारद्वाज जाण ॥
आणि वसिष्ठ गोत्री हे खूण ॥
निरोपिली॥८५॥
महाखाजन ग्राम जेथ ॥
भजन देव रवळनाथ॥
कौशिक गोत्री ब्राह्मण वर्तत ॥
या क्षेत्रामाझारी ॥८६॥
वाडें ग्राम सांतेरी दैवत ॥
वत्स गोत्री ब्राह्मण तेथ ॥
आखे ग्रामी आहेत ॥
ब्राह्मण अत्रि गोत्रींचे ॥८७॥
चिखली ब्राह्मण आणिक एक ॥
त्या ब्राह्मणांचीं गोत्रें ऐक ॥
गार्ग्य धनंजय काश्यपादिक ॥
त्रिगोत्रीचे पैं तेथें ॥८८॥
ऐशी षोडश ग्रामाची स्थिति ॥
तुज सांगितली यथा निगुती ॥
सासष्टी देशाची ऐशी रीति ॥
वर्तत आली जाणगा ॥८९॥

**मटग्राम दुजा ग्राम ॥**
**वेरणें पुढती असे॥**
**कुडतरी लोटली राय ॥**
**शंखावलिहि नागवें॥१॥**
**बाणावली पुढें जाण ॥**
**केळोशी कुडूयळी तसें ॥**
**आखें वाडें द्वयग्राम ॥**
**महाखाजन चीखली॥२॥**
**वाडें खेडेंहि गिर्डोली ॥**
**षोडश गाम - पंगति ॥**
**सासष्टी देश महात्मीं ॥**
**वर्णिती मागिल स्थिती ॥३॥**
**ऐसें सासष्टी देशकथन ॥**
**केलें सविस्तर निरूपण ॥**
**ब्राह्मण गोत्र क्षेत्राचरण ॥**
**कुळदैवत भजन कथियेलें ॥९०॥**



## अध्याय ३ रा.

## ॥ तिसवाडीवृत्तांत ॥

श्रीगणेशाय नमः ॥
श्रोतें मागुती विनविलें ॥
सांगितले विचार जाणितले ॥

आतां सांगावें जी वहिलें ॥
पुढील कथानकातें ॥१॥
मग तिसवाडीचा वृत्तांत ॥
चित्त देऊनि ऐक म्हणत ॥
भजन आचरण समस्त ॥
क्षेत्रस्थान महिमाही॥२॥
जो खुद्द गोमांचल पर्वत ॥
भोंवतें गांव पंचवीस वसत ॥
सर्व मिळूनि द्वीप उदकांत ॥
गोवें नामक नगर तैं ॥३॥
दुसरें द्वीप आहे सरसें ॥
तया नाम दीपवाडी ऐसें ॥
पंच गावीं ससुदाय वसे ॥
एवं तीसवाडी नाम त्यासी ॥४॥
तीसवाडीमाजी प्रथम ग्राम ॥
येळें ग्राम पहिला जाण ॥
भारद्वाज वत्स गोत्री ब्राह्मण ॥
त्यांसी भजन गणेशाचें ॥५॥
गांवशी गांव दुसरा जाण ॥
तेथें चतुर्गोत्रींचे ब्राह्मण ॥
वसिष्ट अत्रि भारद्वाजादि जाण ॥
त्यांसी भजन दुर्गेचें ॥६॥
चिंबलगांवीं देवता भगवती ॥
द्विगोत्र ब्राह्मण तेथें वसती ॥
ते सांगेन तुह्मप्रति ॥
कौशिकवत्सगोत्री हे ॥७॥
आजोशी ग्रामींचे ब्राह्मण ॥
भारद्वाज कौशिकगोत्री जाण ॥
त्यांसी कुलद्रैवत भजन ॥
श्रीलक्ष्मीचें असे कीं ॥८॥
नेवरें ग्रामींचे ब्राह्मण ॥
त्यांचें कौशिक गोत्र जाण ॥
त्यांसी कुलदैवत भजन ॥
माधव शिव गोविंद ॥९॥
एक दुर्गा देवीसी भजती ॥
एक शिव मुख्य म्हणती ॥
ऐशी आहे त्यांचे स्थिति ॥
पूर्वापार पाहे तूं॥१०॥
आतां गांव तळावली ॥
आणिक दोन आहेत जवळी ॥
ऐशीं अष्ट ग्रामाची मेळी ॥
या द्वीपामाझारी॥११॥
तळावली ग्रामीं ब्राह्मण ॥
द्विगोत्रीचे वसती जाण ॥
वत्स आणि कौंडिन्य ॥
वर्तति पैं तेथें॥१२॥
ऐसें येथील कथन ॥
तुवां परिसिलें संपूर्ण॥
आतां ऐके महिमान ॥
द्वीपवाड द्वीपीचे॥१३॥
द्वीपवाड क्षेत्र महाथोर ॥
जेथें देव सप्त कोटेश्वर ॥
नारवें रहिवास मंदिर ॥
स्थान सप्त ऋषींचें॥१४॥
सप्त धातूंचें लिंग म्हणती ॥
तेथें नवरलाची मंद ज्योति ॥
ऐशी नवल प्रभास्थिति ॥
चोजवेना कवणातें॥१५॥
पंचगंगा तीर्थ जेथें ॥
पाताळाहुनी जळ येतें॥
जन्माष्टमी यात्रा भरते ॥
उत्साह अद्भुत होतसे ॥१६॥
जवळी शांताभगवती देव ॥
नारायण दैवत म्हालार गांव ॥
तैसेंची क्षेत्र काळभैरव ॥
न्हावेली गांव तेथें गणपती ॥१७॥
गोलते ग्रामीं भगवती शांता ॥
तेथें आहे चतुर्थ सविता ॥
मध्यें शंभू विराजिता ॥
पंचैतनासहित॥१८॥
ऐशी पंचैतन परवडी ॥
पंचक्रोशीं द्वीपवाडी॥
सप्त कोटेश्वर महिमागाढी ॥
हाटकेश्वरमहात्म्यीं वर्णिली ॥१९॥
क्षेत्र महिमा आणि देवता ॥
पंचस्थानीं कथिलीं तत्वता ॥
आतां चहूं ग्रामींच्या वृत्तांता ॥
गोत्रप्रवरा सांगेन ॥२०॥
दीवगांवींचे दीवकर ॥
तेथें गोत्रसमुदाय फार॥
वत्स अत्रिसांख्यायनगोत्र ॥
वशिष्ट भारद्वाज गौतम ॥२१॥
एकास भैरवाचें ॥
एकासी सांतेरी दुर्गेचें॥

आणि न्हावेलीकर गणेशाचें ॥
भजन करिताती ॥२२॥
नारायण देव म्हालार ॥
गोलते ग्रामीं देव सांतेर ॥
या तिन्ही ग्रामींचे गोत्रोच्चार ॥
ब्राह्मणाचे सांगेन ॥२३॥
कश्यप आणि भारद्वज ॥
जमदग्नि वत्स कौशिक गोत्रज ॥
पांचवे सांगेन तुज ॥
गौतम गोत्रींते॥२४॥
या चतुर्ग्रामींच्या ब्राह्मणासी ॥
देवता पृथक् पृथक् भजनासी ॥
आणि मुख्यतें सप्तकोटेश्वरासी ॥
भजन सर्वासी पैं आहे ॥२५॥
एवं तिसवाडीमाजीं दशग्रामींचें ॥
निरूपण तुजसी केलें साचें ॥
तैसेनि वाडे करूनि गोत्राचे ॥
कुल दैवत भजनादी ॥२६॥
वेळें एक ग्राम दुजा गांवश तिथे ॥
तृतीय नेवरेंचें बलचतुर्थ ॥
आणि आजो शीतळावली येथ ॥
द्वयग्राम आणिक असती ॥२७॥
गोमांचळ वेष्टित अष्ट ग्राम ॥
तैसे द्वीपवाडी माजी चारीनाम ॥
दिवगोलती न्हावेली म्हालारगांव ॥
द्वादशांचा समुदाय ॥२८॥
द्वादश कला भानु बिंबासी ॥
तैसेबारा गांव गोमांचळासी ॥
बोलिलोंसें अल्पवाणीसी ॥
गोमांचळ वर्णनी अपार ॥२९॥
वक्तासांगे श्रोतयासी ॥
त्रिग्राम भट्ट ग्रामासी॥
तीन आहेत अंत्रुजेसी ॥
आणि शेजारा पंचवाडी ॥३०॥
आणिक दोन ग्राम अद्याग्रहारी ॥
एकतें वेरीं शिवेश्वरीं ॥
स्तोल ग्राम खांडोळया माझारी ॥
याती परी सांगेन ॥३१॥
एकादश ग्रामा माझारी ॥
तीन असती अंत्रुजे भीतरी ॥
कोणतीं नांमें म्हणसी तरी ॥
कुंडैमडकै बांदोडें ॥३२॥
बांदिवडें ग्रामींची थोरी ॥
जेथें नागेश वास करी ॥
येथील महिमा वर्णावी तरी ॥
ग्रंथ फार वाढेल ॥३३॥
अति रमणीय स्थान ॥
याक्षेत्रीं द्विगोत्री ब्राह्मण ॥
पुससी कोण कोण ॥
तरी वत्स आणिक कौशिक ॥३४॥
दुसरा ग्राम मडकै म्हणती ॥
तेथ देवी दुर्गा भगवती ॥
तिची महात्म्य वर्णन सुकृती ॥
अद्‌भुत असें॥३५॥
तेथ दोन गोत्रींचे ब्राह्मण ॥
तयासी दुर्गा देवीचें भजन ॥
एक भारद्वाज गोत्री जाण ॥
दुसरें अत्रि गोत्र ॥३६॥
तिसरा नूतन ब्राह्मण ॥
भत्त ग्राम पाळीचा जाण ॥
त्यासी देवोनि कन्या दान ॥
तयेस्थानीं राहविला ॥३७॥
त्यानें मग रवळ नाथ ॥
आणोनि स्थापिला मडकईंत ॥
त्यासी प्रभू कौंडिन्य म्हणत ॥
हा पूर्व वृत्तांत असेगा ॥३८॥
याचें सविस्तर आख्यान ॥
उत्तरार्धीं तुज सांगेन ॥
आधीं सांगेन तेंचि करी श्रवण ॥
स्थिर चित्त करोनी ॥३९॥
तिसरा ग्राम कुंडई परियेसीं ॥
तेथें वास दुर्गा भगवतीसी ॥
तेथें ब्राह्मण वसती त्यासी ॥
गार्ग्य आणि अत्रि गोत्र ॥४०॥
सासष्टी देशाच्या शेजारीं ॥
ग्राम असती पैल तीरीं ॥
मध्यें नदी महा थोरी ॥
या तिन्ही ग्रामासी॥४१॥
आतां भत्त ग्रामींचे तिन्ही ग्राम ॥
त्यामाजीं चूडामणि प्रथम ॥
क्षेत्रस्थान महिमा उत्तम ॥
ब्राह्मण समुदाय उदंड ॥४२॥
कश्यपादि पंचगोत्री ॥
ब्राह्मण वसती तया क्षेत्रीं ॥

जमदग्नि भारद्वाज अत्रि ॥
काश्यप कौंडिन्य आणिकही ॥४३॥
क्षेत्र थोर देवस्थानें बहुत ॥
त्यामाजी चारी मुख्य तेथ ॥
महिमा मोठी ऊर्जा बहुत ॥
महोत्साह सर्वदा॥४४॥
एक श्रीदेवकी कृष्ण विख्याति ॥
दुसरी महामाया भगवति ॥
रवळनाथी दोन स्थानें असती ॥
गावण वाडा आणि पाणदीस ॥४५॥
दुसरा गांव अंबोणें समर्थ ॥
देव अमृतेश्वर दुर्गा सांतेरी तेथ ॥
वेताळ आणि रवळनाथ ॥
ऊर्जानित्यदेवाची॥४६॥
एक काश्यप वत्स गार्ग्य गोत्री ॥
दुसरे ब्राह्मण भारद्वाज त्या क्षेत्रीं ॥
समभाव असे एकत्रीं ॥
जाणगा श्रोतया॥४७॥
तिसरा ग्राम हातुलपुरी ॥
तो अंगभूत चोडणा माझारी ॥
तेथील ब्राह्मण अत्रिगोत्री ॥
क्षेत्रीं दैवत क्षेत्रपाल ॥४८॥
अंत्रुज देशा शेजारी ॥
पंचवाडीची सांगेन परी ॥
तेथील ब्राह्मण वंशा माझारी ॥
विरळा कोणी असेल ॥४९॥
असत्य दोषें लयासी गेले ॥
वंश वर्धन नाहीं चाललें ॥
म्हणसी निमित्त काय झालें ॥
तरी तें ऐक सांगतों ॥५०॥
महाखाजन आणि गिर्डोलीसी ॥
मध्य भूमिकेंत वाद उभयांसी ॥
नीति निवाडा महाजनां पाशीं ॥
शेजार ग्राम कुडतरीस आले ॥५१॥
निवाडा ठेविती अशरीर वाणीवरी ॥
जावोनि ऐकती नदी पैल तीरीं ॥
वंद्रे भूमि कुडतरी माझारी ॥
वैखरी रात्री गुप्त बोले ॥५२॥
महाजनें पंचवाडीकरासी ॥
लांचावितां दिलें लटिक्या साक्षिसी ॥
तेणें तो पावला नाशासी ॥
कृमि सर्वांगीं पडोनी ॥५३॥
लटिकें भूमि वदली जेथ ॥
वदनकाळी म्हणती तेथ ॥
तृण अद्यापि न येत ॥
हे प्रत्यक्ष प्रतीती असे ॥५४॥
भूमिका उभय ग्रामापासूनी ॥
कुडतरी महाजनीं नेली ठकवुनी ॥
पंचवाडीकर त्यापासुनी ॥
साक्षी जाण वर्जिले॥५५॥
एकतो कपटें भूमि साधोनि गेला ॥
दुसरा अनृतें फुकाचि मेला ॥
अपराध शिरीं बैसला ॥
अद्यापवरी त्याचिया॥५६॥
ऐसें पंचवाडीकुडतरीकरांचें ॥
वर्तमान सांगितलें साचें ॥
म्हणोनी पंचवाडीकरांचें ॥
संतान वृद्धिंगत न होय ॥५७॥
आणि अष्टग्रहार देशीं ॥
ऋषिवन आणि कुरंडिसी ॥
एक गोत्रीच ब्राह्मणस्थळासी ॥
देव विमलेश्वर सोमेश्वर दों स्थानीं ॥५८॥
ऋषिवना ह्मणति रिवण ॥
तेथें विमलेश्वर देव सगुण ॥
कुरंडी ग्रामीं सोमेश्वर जाण ॥
देवाचें भजन ब्राह्मणासी ॥५९॥
आतां विळणें ग्रामीं शिवेश्वरी ॥
तेथें देवाची ऊर्जा थोरी ॥
मूळवीर देवाची ख्याति बरी ॥
भजन त्याच दैवताचें ॥६०॥
एक पेडणें देशींहुनी ॥
एक सासष्टी देशाकडुनी ॥
आपुलें कुलदैवत स्थापोनी ॥
विळणें ग्रामीं राहिले ॥६१॥
तेथें त्रि गोत्रींचे ब्राह्मण ॥
अलीकडे खोलग्रामीं श्रीनारायण ॥
तेथें वत्सगोत्री ब्राह्मण ॥
वसताती पैं गा॥६२॥
ऐसें एकादश ग्रामींचें कथन ॥
क्षेत्र महिमा सगोत्र ब्राह्मण ॥
आणि कुलदैवतादिकांचें भजन ॥
संक्षिप्तार्थें कथियेलें ॥६३॥



## अध्याय ४.

## ॥ ऐक्यदर्शन ॥

श्रीगणेशायनमः ॥
सोळा ग्राम सासष्टी देशातिल ॥
बारा गांव तिसवाडी मधील ॥
अकरा ते पूर्वदक्षिणेकडील ॥
गोमांचळा पसोनी ॥१॥
हा सांप्रदाय सांगितला एक ॥
आणिक तिन्ही आहेत देख ॥
कोण ह्मणसी तरी ऐक ॥
कोरवाळी मांदरें कोरगांव ॥२॥
कोरवाळी बार देशामाझारी ॥
काळभैरव त्या क्षेत्रीं ॥
तेथें ब्राह्मण गौतम गोत्रीं ॥
वसताती पैं हो॥३॥
कोरगांव मांदरें पेडणें देशीं ॥
महालक्ष्मी सप्तेश्वर देव मांदरेसी ॥
देवता चरित्र महिमेसी ॥
वर्णितां न वर्णवे॥४॥
लक्ष्मी स्मरण करूनि पाणी ॥
घालितां महाविष उतरे तत्क्षणी ॥
निर्विष सावध होय प्राणी ॥
अभिनव करणी देवीची ॥५॥
जे देशीं असेल मांदरेकर ॥
त्याणें स्वहस्तें घालितां नीर ॥
निर्विष होय हा चमत्कार ॥
जगप्रसिद्ध आश्चर्य हें ॥६॥
ऐसें तेथील देवीचें महिमान ॥
जामदग्न्य वत्स गोत्री ब्राह्मण ॥
आणिक एक आहे तें जाण ॥
अत्रि गोत्र तिसरें ॥७॥
दुसरें कोरगांव महाथोर ॥
मुख्य देव तेथें कमलेश्वर ॥
हरिकथा पुराण निरंतर ॥
अगाध महिमा देवाची ॥८॥
गणिका नाचती बहुत ॥
वाद्य नृत्य अखंडीत॥
कार्तिकीं पुराण भारत वाचित ॥
ऊर्जा बहुत देवाची ॥९॥
तेथें ब्राह्मण गोत्रें चार ॥
एक कौशिक दुजा अत्रिगोत्र ॥
भारद्वाज काश्यप थोर ॥
गोत्रींचे ब्राह्मण तेथें ॥१०॥
ऐशी बेचाळीस ग्रामांची मांडणी ॥
यावत्काल तों हेचि मिळणी ॥
वर्तताती एकपर्णी ॥
पूर्वील काहणी जाणावी॥११॥
श्रोता विनवी जोडिल्या करीं ॥
जे कां सांगितली कुशरी ॥
परी चारी ग्राम कुडवाळ देशाभीतरी ॥
त्याची परी सांगावे ॥१२॥
कुळकर्णी ऐसें उपनाम त्यांसी ॥
नकळे तयांच्या वृत्तांतासी ॥
तरी ते कोणत्या ठिकाणासी ॥
प्रगट जनासी करावें ॥१३॥
ऐकोनि श्रोतयाचें वचन ॥
वक्ता म्हणे ऐक सांगेन ॥
आतां तयाचा ठाव ठिकाण ॥
समग्र जाण परीयेसी ॥१४॥
नेरूर सरंबळ नदीतीरीं ॥
दोनी ग्राम कसब्या शेजारीं ॥
परूळें ग्राम समुद्रतीरीं ॥
चौथा ग्राम मसुरें॥१५॥
जे सांगितली बेचाळीस ग्रामावलिका ॥
याची समुदायामधील देखा ॥
उदरवृत्तीस्तव जेका ॥
वृत्ति धरोनि राहिले॥१६॥
आंबोणें भत्तग्रामींहुनी आला ॥
साळीचें टेंबनेरूरीं वस्तीस राहिला ॥
ग्रामस्थीं विप्र तो लेखक ठेविला ॥
नेरूरकर महाजनीं ॥१७॥
अष्टपुत्रे उपनाम त्यासी ॥
काश्यप नैध्रुव गोत्रयासी ॥
हा पूर्व वृत्तांत चतुरांसी ॥
ठाऊक असे कीं॥१८॥
सरंबळचे कुळकर्णी पाणदीकर ॥
मागें सांगितला पुरोहित पुत्र ॥
केळोशीच्या वृत्तांतीं संज्ञामात्र ॥
कथियेले असती ॥१९॥
तेथें ग्रामस्थ आले मसुरींचे ॥
त्यांसी अगत्य झालें लेखकाचे ॥
नेऊनि आपुले ग्रामीचें ॥
कुललेखन दिधलें॥२०॥

